**उच्च व्यवसायिक व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजनेकरिता अनुदान उपलब्ध करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्याक विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक :अविवि-२००९/प्र.क्र.२१२/०९/का-४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ६ मार्च, २०१०

संदर्भ :- १) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक :अविवि २००९/ प्र.क्र. २१२/०९/का-४, दि. ३ फेब्रुवारी, २०१०

**शासन निर्णय :**

संदर्भांकीत शासन निर्णयान्वये राज्यातील अल्पसंख्याक समाजातील उच्च व्यवसायिक शिक्षण घेणाऱ्या व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिकत असलेल्या आर्थिकदृष्टया कमकुवत व गुणवत्ताधारक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजना कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २००९-१० या वर्षासाठी राखून ठेवण्यात आलेल्या रुपये १५ कोटी एवढया अनुदानापैकी रु.१० कोटी एवढी रक्कम वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. यापैकी रु.९ कोटी इतकी रक्कम संचालक (तंत्र शिक्षण), तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या स्वाधीन करण्यात येत असून त्यापैकी रु. ५० लक्ष इतकी रक्कम इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरिता लागू असलेल्या शिष्यवृत्ती योजनेकरिता राखीव ठेवण्यात यावेत. या दोन्ही प्रयोजनार्थ ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पहातील. उर्वरित रु.१.०० कोटी एवढी रक्कम संचालक (वैद्यकीय शिक्षण), वैद्यकीय शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या स्वाधीन करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पहातील.

संचालक (तंत्र शिक्षण ), तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना सन २००९-१० करिता वितरीत करावयाच्या एकूण रु.९ कोटी (रुपये नऊ कोटी फक्त)आणि संचालक (वैद्यकीय शिक्षण), वैद्यकीय शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना सन २००९-१० करिता मंजूर करण्यात आलेल्या एकूण रु. १.०० कोटी (रु. एक कोटी फक्त) एवढ्या निधीच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

या योजनेंतर्गत होणारा खर्च मागणी क्र.झेड ई-१ ए, मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (२०) उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजनेकरिता सहायक अनुदान (२२३५-ए-३३८) या खाली सन २००९-१० या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसं-११३/व्यय-४,दि.२३/२/२०१० अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.mdd.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००३०६१४४००१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सही/-**
**( खालिद बी. अरब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व मंत्रालयीन विभाग
संचालक, उच्च शिक्षण, पुणे
संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई
संचालक, वैद्यकीय शिक्षण, मुंबई
संचालक (कृषि), कृषि संचालनालय, महाराष्ट्र राज्य,
संचालक (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी)
निवडनस्ती.

* पत्राने.